**आदिवासी उपयोजना क्षेत्रातील योजनांचा/ कार्यक्रमांचा आढावा घेण्यासाठी प्रकल्पस्तरीय (नियोजन आढावा) समितीची स्थापना...**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,

**शासन निर्णय क्रमांक : टिएसपी-१९९२/प्र.क्र.१३ (१)/का.६**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ११ फेब्रुवारी, १९९३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक सीबीसी-१०७८/(३६७-२४८२), दिनांक १५ नोव्हेंबर, १९८८.

२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग क्रमांक एएससी-१०८०/६५८३८/का.१५, दिनांक १.११.१९८०

३) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांक एएससी-१०८०/१३०१/का.१५, दिनांक १९.७.१९८४

४) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांक आस्था-१०८९/प्र.क्र.७९९/ का.१५, दिनांक १५.१.१९९२.

संदर्भातील अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजना क्षेत्रात राबविल्या जाणाऱ्या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा प्रकल्प स्तरावर घेण्यासाठी प्रकल्पस्तरीय अंमलबजावणी समित्यांची स्थापना करण्यात आली होती. सदर आदेशानुसार या समित्यांचे अध्यक्ष हे अपर आयुक्त, आदिवासी विकास आहेत व संबंधित प्रकल्प अधिकारी हे या समितीचे सदस्य सचिव आहेत. योजना राबविणाऱ्या सर्व संबंधित अधिकाऱ्यांना सदस्य म्हणून योजनेच्या बैठकीस हजर राहण्यास सांगण्यात येत होते.

२. अ.क्र.२ येथील शासन निर्णयानुसार प्रत्येक आश्रमशाळेकरिता स्थानिक समित्यांच्या नियुक्तीचे आदेश देण्यात आले होते. या समित्यांवर संबंधित ग्राम पंचायतीचे सरपंच, अध्यक्ष म्हणून व आश्रमशाळेतील मुख्याध्यापक, सदस्य सचिव म्हणून काम करीत होते.

३. याशिवाय अ.क्र.३ येथील शासन निर्णयानुसार तालुका स्तरावरील आश्रमशाळेचे निरीक्षण योग्यरितीने होण्याकरिता समित्यांची स्थापना करण्यात आली होती. या समित्यांच्या अध्यक्षपदी मतदार संघातील स्थानिक आमदार किंवा ज्या मतदार संघात आमदार नसतील, अशा मतदार संघाच्या समित्यांच्या अध्यक्षपदी संबंधित जिल्हा परिषदेच्या समाजकल्याण समितीच्या सभापतीची नियुक्ती केली जात होती. संबंधित आदिवासी विकास अधिकारी हे या समितीचे सदस्य सचिव म्हणून काम करीत होते.

४. दरम्यानच्या काळात राज्यातील एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्पांच्या संख्येत वाढ झाली. त्याचप्रमाणे आदिवासी उपयोजना क्षेत्राव्यतिरिक्त माडा पॉकेट व मिनीमाडा पॉकेट व मिनी माडा पॉकेट संकल्पना अस्तित्वात आली. या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने क्षेत्रीय कार्यालयाची पुनर्रचना करण्याचा निर्णय घेतला

आणि प्रस्तावनेतील अ.क्र.४ येथील आदेशान्वये प्रकल्पस्तरीय यंत्रणेची पुनर्रचना करण्यात आली असून, आता नव्या रचनेनुसार आदिवासी विकास आयुक्त, चार अपर आयुक्त, आदिवासी विकास व चोवीस प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प अशी कार्यालये स्थापन करण्यात आली आहेत. प्रकल्प अधिकाऱ्यांकडे आता विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या मागासवर्गीय कल्याणाच्या योजनांव्यतिरिक्त इतर विभागामार्फत आदिवासी विकास क्षेत्रात राबविल्या जाणाऱ्या योजना व बिगर आदिवासी क्षेत्रात राबविल्या जाणाऱ्या वैयक्तिक लाभाच्या योजना इत्यादी योजनेचे संनियंत्रण व नियोजनाच्या कामाची जबाबदारी सोपविण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-** वरील सर्व परिस्थिती विचारात घेता, संदर्भातील अ.क्र.१ व ३ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन शासन आता असे आदेश देत आहे की, या सध्याच्या दोन समित्यांऐवजी आदिवासी उपयोजना क्षेत्रात असणाऱ्या जिल्ह्यांकरिता परिशिष्ट "अ" प्रमाणे २१ प्रकल्पस्तरीय (नियोजन व आढावा) समित्या स्थापन करण्यात याव्यात :-

या समित्यांची रचना खालीलप्रमाणे राहिल :-

| | | |
|---|---|---|
| (१) | प्रकल्प क्षेत्रातील आदिवासी विधानसभा सदस्य<br>(अ) प्रकल्प क्षेत्रात एकाहून अधिक आदिवासी विधानसभा सदस्य असल्यास शासनाकडून नामनिर्देशित करण्यात येणारे आदिवासी विधानसभा सदस्य राहतील.<br>(ब) प्रकल्प क्षेत्रात आदिवासी विधानसभा सदस्य नसतील तर शासन नियुक्त पंचायत समितीचे आदिवासी सभापती किंवा शासन नियुक्त प्रमुख आदिवासी व्यक्ती असतील. | उपाध्यक्ष |
| (२) | अपर आयुक्त, आदिवासी विकास | उपाध्यक्ष |
| (३) | प्रकल्प क्षेत्रातील संसद सदस्य (लोकसभा व राज्यसभा) | विशेष निमंत्रित |
| (४) | जिल्हा परिषदेंच्या समाजकल्याण समितीचे सभापती व महिला व बालकल्याण समितीच्या सभापती | निमंत्रित |
| (५) | प्रकल्प क्षेत्रातील शासनाने नियुक्त करावयाचे ३ अशासकीय सदस्य (या तीन अशासकीय सदस्यात अनुसूचित जमातीची एक महिला सदस्य व अनुसूचित जमातीतील २ पुरुष सदस्य) | सदस्य |
| (६) | प्रकल्प क्षेत्रातील महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळाचे प्रादेशिक किंवा सहाय्यक प्रादेशिक व्यवस्थापक | सदस्य |
| (७) | प्रकल्प क्षेत्रातील सर्व आदिवासी विकास योजनांची जिल्हा स्तरावरील अंमलबजावणी अधिकारी | सदस्य |
| (८) | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य सचिव |

२. **<u>या समित्यांची कार्य कक्षा खालीलप्रमाणे राहील :-</u>**

(१) प्रकल्प क्षेत्रापुरत्याचे मुलभूत विकासाच्या सोयीसंबंधीचे नियोजन म्हणजेच प्रकल्प क्षेत्रासाठी मुलभूत सोयींचा आराखडा तयार करणे, (सर्व विभागाच्या योजना, ज्यासाठी आदिवासी उपयोजनेतून तरतूद केली जाते.)

(२) आदिवासी विकास विभागामार्फत "मागासवर्गीयांचे कल्याण" विकास उपशिर्षांतर्गत राबविण्यात येणाऱ्या योजनांवर आढावा घेणे. (उदा.न्युक्लिअस बजेट योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे, आश्रमशाळा व्यवस्थापन,वसतिगृह, न्युक्लिअस बजेट, आदिवासी शेतकऱ्यांना वीजपंप/तेलपंप पुरविणे इत्यादी)

(३) आदिवासी विकास महामंडळाच्या कामकाजावर आढावा, त्यास खावटी कर्जाचे वाटप, एकाधिकार खरेदी योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा या बाबी समाविष्ट आहेत.

(४) पंचवार्षिक व वार्षिक आदिवासी उपयोजनेतील महत्वाच्या योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे, (उदा.आय.आर.डी.पी.आदिवासी पाड्यांना वीज पुरवठा,पिण्याच्या पाण्याची योजना, आदिवासी शेतकऱ्यांना कृषि विषयक सहाय्य) व त्यानुसार आदिवासी विकासाकरिता असलेल्या जिल्हा नियोजन व विकास मंडळांतर्गत संबंधित विशेष कार्यकारी समितीला व शासनाला शिफारशी करणे.

(५) दुर्गम क्षेत्रासाठी राबविण्यात येणाऱ्या विकास योजनांचे संनियंत्रण करणे, हे करीत असताना मा.मुख्यमंत्री यांनी राज्यातील आदिवासी क्षेत्रातील अतिदुर्गम भागासाठी जाहीर केलेल्या प्राथमिक शिक्षण, प्राथमिक आरोग्य सेवा, शिधा वाटपासाठी स्वस्त धान्य दुकाने, आदिवासी पाड्यांची महसुली गांवे म्हणून जाहीर करणे, रोजगार हमी योजनेंतर्गत आवश्यक तीतकी कामे मंजूर करुन घेण्यासंबंधीची कार्यवाही, रस्त्यांची कामे व अंगणवाड्या स्थापन करणे, पिण्याच्या पाण्याची सोय, लघु पाटबंधाऱ्याची कामे इत्यादी कामाचा आढावा प्रामुख्याने घेणे.

(६) जिल्हा व प्रकल्प पातळीवरील निरनिराळे विभाग व जिल्हा परिषद इत्यादी सर्व कार्यान्वयीन अभिकरणाव्दारे समन्वय साधला जात आहे, याची खात्री करणे, आणि

(७) अनुसूचित जमातीसाठी काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्था व शासन यांच्यामध्ये समन्वय साधणे.

४. **समितीच्या बैठकीबाबतची कार्यप्रणाली :-**

(१) प्रत्येक प्रकल्पस्तरीय (नियोजन व आढावा) समितीची बैठक आवश्यकता भासेल त्याप्रमाणे वरचेवर परंतु निदान ३ महिन्यातून एकदा घेण्यात यावी.

(२) ज्या जिल्ह्यात एकाहून अधिक एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प असतील त्या जिल्ह्यातील प्रकल्पस्तरीय समितीच्या बैठका शक्य तो जिल्ह्याच्या मुख्यालयाच्या ठिकाणी घेण्यात याव्यात. तथापि, सदरहू वेगवेगळ्या प्रकल्पस्तरीय समित्यांच्या बैठका एकाचवेळी ठरविण्यात येणार नहीत, याची दक्षता घेण्याच्या दृष्टीने अशा प्रकारच्या बैठकीचे आयोजन या समितीचे उपाध्यक्ष म्हणजेच अपर आयुक्त, आदिवासी विकास हे ठरवितील, त्याप्रमाणे करण्यात यावे.

(३) या समितीच्या बैठकीस एकूण सदस्यांच्या १/३ सदस्यांची नियुक्ती उपस्थिती आवश्यक आहे. मात्र अपर आयुक्त, आदिवासी विकास किंवा त्यांचे कार्यालयातील संबंधित वरिष्ठ अधिकारी

किंवा अपवादात्मक परिस्थितीत त्यांचेकडील संबंधीत वरिष्ठ अधिकारी यांनी उपस्थित असणे आवश्यक राहील.

(४) अध्यक्षांच्या अनुपस्थितीत उपाध्यक्ष हे कामकाज चालवतील.

(५) या समितीच्या बैठकीची कार्यसूची त्याचप्रमाणे बैठकीचे कार्यवृत्त हे सदस्य सचिव सादर करतील.

(६) या बैठकीला फक्त विषय सूचींशी व प्रकल्पांतर्गत आदिवासी विकास कार्यक्रमांशी संबंध असणाऱ्या/आवश्यकता असणाऱ्या जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांनांच आमंत्रित करावे.

५. <u>प्रकल्पस्तरीय समितीच्या बैठकीतील निर्णयाबाबत :-</u>

प्रकल्पस्तरीय समिती ही सल्लागार स्वरुपाची समिती असल्याने बैठकीत निर्णय घेताना मतदार घेणे अपेक्षित नाही. सर्वसामान्यपणे मतैक्याने निर्णय घेण्यात यावेत, मतभेद झाल्यास समितीच्या अध्यक्षांचा निर्णय अंतिम राहील. ढोबळमानाने योजनांचा आढावा घेणे, आदिवासी उपयोजनेचा आराखडा अंतिम करणे, धोरणात्मक बदल सुचविणे इत्यादी जबाबदाऱ्या समितीच्या राहतील. परंतु व्यक्तिगत प्रकरणी विचार करणे तसेच प्रशासकीय बाबतीत लक्ष घालून निर्णय घेणे इत्यादी बाबी समितीच्या कार्यकक्षेत अभिप्रेत नाही, हे स्पष्ट करण्यात येत आहे.

६. विभागाच्या पुनर्रचनेनंतर परिशिष्ट "अ" येथे दर्शविलेल्या प्रकल्प अधिकाऱ्यांव्यतिरिक्त इतर प्रकल्प अधिकाऱ्यांचे कार्यक्षेत्र बरेच विस्तृत झाले आहे. काही प्रकल्प अधिकाऱ्यांच्या कार्यक्षेत्रात आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील जिल्हासुध्दा अंतर्भूत आहे. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील आदिवासींना बिगर आदिवासी उपयोजना (ओ.टि.एस.पी.) निधीमधून वैयक्तिक लाभाच्या योजना देण्याबाबतचे शासनाचे धोरण आहे. या बाबी लक्षात घेता, ज्या प्रकल्प अधिकाऱ्यांचे कार्यक्षेत्र हे बिगर आदिवासी उपयोजना (ओ.टि.एस.पी.) क्षेत्रात आहे. अशा जिल्ह्यांमध्ये आदिवासींकरिता राबविल्या जाणाऱ्या योजनांचा निर्णय प्रकल्पस्तरीय समितीने न घेता संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या समितीव्दारे नियमित होणाऱ्या बैठकीतून घ्यावा.

७. या समित्यांवर नियुक्त करण्यात येणारे अध्यक्ष व अशासकीय सदस्य यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येत आहेत.

८. प्रकल्पस्तरीय समित्यांवर नियुक्त केलेले अशासकीय सदस्य तसेच राज्य विधानमंडळ सदस्य यांना प्रकल्प समित्यांच्या बैठकांना उपस्थित राहिल्याबद्दल मानधन अथवा मोबदला अथवा शुल्क अनुज्ञेय असणार नाही. परंतु प्रवासभत्ता व दैनिक भत्ता मुंबई नागरी सेवा नियम, खंड-२ मधील परिच्छेद ४२ (ए) यातील सेक्शन-१ मधील १ (१) च्या तरतूदीनुसार व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक टीआरअे-१४४७७/१०३२/सी/एसईआर-५, दिनांक २३.९.७७, क्रमांक टीआरअे- १०८३/१४२६/एसईआर-५, दिनांक , शासन निर्णय क्रमांक प्रवास-१०९२/सीआर ५९/ सेवा-५, दिनांक १.४.१९९२ च्या आधारे नियमित केला जावा. या नियमांच्या तरतूदी केवळ रेल्वे, सडक प्रवासासाठी लागू असल्यामुळे तसेच शासनाच्या काटकसरीच्या धोरणानुसार प्रथमश्रेणीच्या शासकीय अधिकाऱ्यांना विमान प्रवासावर बंदी असल्यामुळे अशासकीय सदस्यांना विमान प्रवास तसेच रेल्वेच्या प्रथम वर्ग वातानुकुलीत प्रवास अनुज्ञेय असणार नाही. तसेच खाजगी वाहनाचाही प्रवास त्यांना अनुज्ञेय असणार

नाही. समितीवर सदस्य/अध्यक्ष म्हणून असणाऱ्या विधानसभा सदस्यांना प्रवासभत्ता, दैनिक भत्ता, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक टिआरऐ-१४७७/१३१/ दिनांक २७.१.१९७१ प्रमाणे खासदार/आमदार यांना विधानमंडळाच्या कामकाजासाठी अनुज्ञेय असलेल्या दराप्रमाणे नियमित केला जावा. अशासकीय सदस्यांचे प्रवासभत्ते देण्याबाबत प्रकल्प अधिकारी हे नियंत्रण अधिकारी (कंट्रोलिंग व काऊंटर साईनिंग) राहतील. यावरील खर्च प्रकल्प अधिकारी हे त्यांच्याकडे असलेल्या प्रवास निधीतून भागवतील.

९. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या पूर्व संमतीनुसार त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७५४/९२/सेवा-५, दिनांक ८.९.१९९२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गो. जा. दहिवीले )
उप सचिव,
आदिवासी विकास विभाग

## परिशिष्ट "अ"

**आदिवासी उपयोजना क्षेत्रातील योजना/कार्यक्रमांचा आढावा घेण्यासाठी नेमण्यात आलेल्या प्रकल्पस्तरीय (नियोजन आढावा) समित्यांचे कार्यक्षेत्र.**

| अ.क्र. | जिल्हा | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | तालुके | माडा/मिनीमाडा |
|---|---|---|---|---|
| १ | रायगड | पेण | कर्जत व रायगड जिल्ह्यातील सर्व तालुके | कर्जत,पेण व खालापूर हे माडा पॉकेटस् व पनवेल,रोहा, सुधागड हे मिनीमाडा पॉकेट |
| २ | ठाणे | शहापूर | शहापूर,ठाणे मुरबाड,भिवंडी, कल्याण,उल्हासनगर | मुरबाड माडा पॉकेट |
| ३ | ठाणे | डहाणू | डहाणू,पालघर,तलासरी,वसई | -- |
| ४ | ठाणे | जव्हार | जव्हार,वाडा,मोखाडा | -- |
| ५ | पुणे | घोडेगांव | पुणे जिल्ह्यातील सर्व तालुके | खेड माडा पॉकेट व मावळ मिनीमाडा पॉकेट |
| ६ | नाशिक | नाशिक | पेठ, दिंडोरी, इगतपूरी, नाशिक, सिन्नर, नांदगांव | इगतपूरी माडा पॉकेट व चांदवड,सिन्नर मिनीमाडा पॉकेट |
| ७ | नाशिक | कळवण | कळवण, सुरगाणा, बागलाण,मालेगांव,निफाड, येवला,चांदवड | -- |
| ८ | अहमदनगर | राजूर | अहमदनगर जिल्ह्यातील सर्व तालुके | संगमनेर मिनीमाडा |
| ९ | जळगांव | यावल | जळगांव जिल्ह्यातील सर्व तालुके | रोवर माडा पॉकेट |
| १० | धुळे | नंदुरबार | नंदुरबार, नवापूर, शिरपूर, सिंदखेडा,धुळे, साक्रि | -- |
| ११ | धुळे | तळोदा | तळोदा, अक्कलकुवा, अक्राणी, शहादा | -- |
| १२ | नांदेड | किनवट | किनवट तालुका व नांदेड जिल्ह्यातील उर्वरित तालुके | हादगांव व भोकर मिनीमाडा पॉकेट |
| १३ | यवतमाळ | पांढरकवडा | यवतमाळ जिल्ह्यातील सर्व तालुके | यवतमाळ, कर्जत, उमरखेड, महागांव, पुसद, निमपूर हे माडा पॉकेटस् व नेर व दिग्रस मिनी माडा पॉकेटस् |
| १४ | अमरावती | धारणी | अमरावती जिल्ह्यातील सर्व तालुके | वरुड-मोर्शी माडा पॉकेटस् अचलपूर मिनीमाडा पॉकेटस् |

| अ.क्र. | जिल्हा | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | तालुके | माडा/मिनीमाडा |
|---|---|---|---|---|
| १५ | नागपूर | नागपूर | नागपूर जिल्ह्यातील सर्व तालुके | रामटेक, काटोल, पारशिवणी, व सावनेर माडा पॉकेट उमरेड मिनी माडा पॉकेट |
| १६ | भंडारा | देवरी | भंडारा जिल्ह्यातील सर्व तालुके | सालेकसा, गोदिया देवरी-१, देवरी-२, अर्जुनी, मोरगांव, साकीली, देवरी-३, गोरेगांव माडा पॉकेटस् |
| १७ | चंद्रपूर | चिमूर | वरोरा, कॅचेमूर, भद्रावती, ब्रम्हपुरी, नागभिड | नागभिड माडा व मिनी माडा पॉकेटस् |
| १८ | चंद्रपूर | चंद्रपूर | चंद्रपूर, धुळे, गोंडपिंपरी, सिंदेवाही, राजूरा | सिंदेवाही, गोंडपिंपरी माडा पॉकेटस् |
| १९ | गडचिरोली | अहेरी | अहेरी, सिरोंचा, चार्मोशी | -- |
| २० | गडचिरोली | गडचिरोली | धानोरा, कुरखेडा, आरमोरी, गडचिरोली | -- |
| २१ | गडचिरोली | भामरागड | गडचिरोली, जिल्ह्यातील एटापल्ली तालुका | -- |